सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी गट-अ संवर्गातील उमेदवारांच्या परिविक्षाधिन प्रशिक्षण कालावधीकरिता४ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०३१४/प्र.क्र.११४/परि-४

जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई,

तारीख: ६ ऑगस्ट, २०१४

**वाचा :**

१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. १४७७(२)/२०१३/(शिफारस)/चौदा-अ, दि.१८.३.२०१४

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०११/प्र.क्र१८५/११/वित्तीय सुधारणा-१, दि.२६.८.२०११

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दि.११.७.२०१२

४) सा.प्र.वि., शासन निर्णय क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.१.२०१४

५) सा.प्र.वि. चे पत्र क्र. टिआरएन-२०१४/४२४/प्र.क्र.५३/१४/१२-अ, दि. ११.४.२०१४

६) सा.प्र.वि., शासन निर्णय क्र. टिआरएन-२०१४/प्र.क्र.९९/१४/१२-अ(१), दि.९.५.२०१४

**प्रस्तावना :**

राज्य सेवा (मुख्य) परीक्षा-२०१३ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-अ या संवर्गातील पदाकरिता ४ उमेदवारांची शिफारस केली आहे. संदर्भाधीन क्र. ३ व ४ च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्य सेवा परीक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण देण्यात येणार आहे. त्याअनुषंगाने सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-अ या संवर्गातील अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

राज्य सेवा (मुख्य) परीक्षा-२०१३ अंतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-अ संवर्गासाठी रुपये ९३००-३४८०० (ग्रे.पे. ४६००) या वेतनश्रेणीत ४ अधिसंख्य पदे दि.६.६.२०१४ पासून २ वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. सदर अधिसंख्य पदे परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. संदर्भाधीन क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये निर्देशित केल्यानुसार संबंधित परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचा एकत्रित परिविक्षाधीन कार्यक्रम दि. ९.६.२०१४ पासून सुरु झाला आहे. परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीत गट-अ संवर्गातील प्रत्येक उमेदवारांना रु. ३०,०००/- एवढी मासिक ठोक रक्कम संबंधित विभागाने यशदा, पुणे या संस्थेस उमेदवारांच्या संख्येनुसार त्रैमासिकरित्या अग्रिम निधी उपलब्ध करुन द्यावयाचा आहे. त्याअनुषंगाने सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी गट-अ, संवर्गामध्ये नियुक्ती द्यावयाच्या ४ उमेदवारांना २ वर्षांच्या प्रशिक्षण कालावधीत ठोक रक्कम अदा करण्यासाठी एकूण रु. २८,८०,०००/- एवढा खर्च येईल. त्याप्रमाणे ठोक वेतनासाठी येणारा खर्च सन २०१४-१५ व त्यानंतरच्या आर्थिक वर्षामध्ये यशदा, पुणे या संस्थेस परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देत आहे.

४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्रैमासिकरित्या अग्रिम निधी उपलब्ध करुन द्यावा. प्रशिक्षण जून, २०१४ पासून सुरु झाले असल्याने माहे जूनच्या वेतनासाठी त्वरीत तर जून, २०१४ अखेरच्या तिमाहीसाठी निधी उपलब्ध करुन द्यावा तसेच सप्टेंबर, २०१४ अखेरच्या, तिमाहीपासून प्रशिक्षण कार्यक्रम समाप्त होईपर्यंत प्रत्येक तिमाहीसाठी याप्रमाणे परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी यशदा, पुणे यांना वेळीच निधी उपलब्ध करुन द्यावा.

५. परिविक्षाधीन कालावधी पूर्ण झाल्यानंतर संबंधित विभागाकडे हजर झाल्यावर या उमेदवारांच्या २ वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीत अदा करण्यात आलेली ठोक वेतनाची रक्कम आणि प्रत्यक्ष वेतन यामधील फरकाची रक्कम संबंधित विभागाकडून आवश्यक ते समायोजन केल्यानंतर (जसे भविष्य निर्वाह निधी अंशदान, व्यवसाय कर, आयकर इ.) एक रकमी अदा करण्यात येईल.

६. यासाठी येणारा खर्च "मागणी क्र.बी-३, मुख्य लेखाशिर्ष २०४१ वाहनावरील कर (०१) ००१ संचालन व प्रशासन (२०४१००१८) ०१ वेतन (योजनेत्तर) (दत्तमत)" या लेखाशिर्षातर्गत सन २०१४-१५ व त्यानंतरच्या वित्तीय वर्षातील मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा तसेच सदर बाबीसाठी या वर्षाकरिता आवश्यक असणाऱ्या अतिरिक्त रकमेसाठी सुधारित अंदाजामध्ये प्रस्ताव सादर करावा.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं-२४३/विसू-१, दि.३०.७.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०७११३७००२८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhojraj Gowindrao Gondole

Digitally signed by Bhojraj Gowindrao Gondole
DN: CN = Bhojraj Gowindrao Gondole, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.08.07 11:43:58 +05'30'

**(भो. गो. गोंदोळे)**
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३. अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५. वित्त विभाग-व्यय-८/वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई
६. सामान्य प्रशासन विभाग, (कक्ष १२-अ), मंत्रालय, मुंबई
७. महासंचालक,यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे
८. निवडनस्ती, परिवहन -४